तात्पुरती ज्येष्ठता सुची- दि.०१.०१.२०१६
रोजीची पदवीधर उप अभियंता (विद्युत)

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक बांधकाम विभाग
शासन परिपत्रक क्रमांक :ज्येष्ठता २०१६/प्र.क्र.१३९/आस्था-१
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- ०४ जानेवारी, २०१७.

वाचा:-

१. शासन परिपत्रक,सार्वजनिक बांधकाम विभाग, क्र.ज्येष्ठता २०१४/ प्र.क्र.३४/ आस्था-१, दि.०५.०५.२०१५.
२. शासन निर्णय, उद्योग उर्जा व कामगार विभाग, संकीर्ण २०१४ /प्र.क्र.५८८/उर्जा-२, दि.२६.०२.२०१५.
३. शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, नियुक्ती २०१४ /प्र.क्र.८३/सेवा-२, दि.१२.०२.२०१५.
४. शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, नियुक्ती २०१५/प्र.क्र.१५९/सेवा-२, दि.०४.०७.२०१५.

परिपत्रक: -

सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत विद्युत संघटनेतील उपअभियंता (विद्युत) संवर्गाची दि.१.१.२००६ ते दि.३१.१२.२०१३ या कालावधीची म्हणजेच दि.१.१.२०१४ रोजीची अंतिम ज्येष्ठतासूची संदर्भ क्र.१ येथील परिपत्रकान्वये दि.०५.०५.२०१५ रोजी प्रसिध्द करण्यात आली आहे. दि.१.१.२०१६ रोजीची पदवीधर उप अभियंता (विद्युत) संवर्गाची तात्पुरती ज्येष्ठतासूची तयार करून प्रसिध्द करण्याची कार्यवाही शासनाच्या विचाराधिन होती.

२. संदर्भ क्र.२ येथील उद्योग उर्जा व कामगार विभागाच्या दि.२६.०२.२०१५ रोजीच्या शासननिर्णयानुसार, विद्युत अधिनियम २००३ व त्यानुषंगाने बनविण्यात आलेले नियम व विनियम सक्षमपणे राबविण्याकरिता सध्या सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अधिपत्याखाली कार्यरत असलेले विद्युत निरीक्षणालय, विद्युत निरीक्षक व त्यांचे अखत्यारीतील अधिकारी आणि कर्मचारी ह्यांची सन २००६ च्या आकृतीबंधानुसार मंजूर असलेली पदे (रिक्त पदासह) तसेच संबधित पदांवर कार्यरत अधिकारी, कर्मचाऱ्यांसह शासनाच्या उर्जा विभागाच्या अधिपत्याखाली आणण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. सदर शासननिर्णयानुसार इच्छुकतेच्या आधारे सार्वजनिक बांधकाम विभागातील काही विद्युत अभियंत्यांच्या सेवा उद्योग, उर्जा व कामगार विभागाकडे वर्ग करण्यात आल्या आहेत.

३. संदर्भ क्र.१ येथील परिपत्रकानुसार प्रसिध्द करण्यात आलेल्या दि.१.१.२००६ ते दि.३१.१२.२०१३ या कालावधीच्या म्हणजेच दि.१.१.२०१४ रोजीच्या एकत्रित अंतिम ज्येष्ठतासूचीत समावेश असलेल्याही सार्वजनिक बांधकाम विभागातील काही विद्युत उपअभियत्यांच्या सेवा वर नमूद केल्याप्रमाणे इच्छुकतेच्या आधारे उद्योग, उर्जा व कामगार विभागाकडे वर्ग करण्यात आल्या आहेत. त्यामुळे सदर ज्येष्ठतासूची तयार करताना या वस्तुस्थितीनुषंगाने कार्यवाही करणे आवश्यक होते. त्यानुसार सदर संवर्गाची ज्येष्ठतासूची तयार करताना दि.०१.०१.२०१६ रोजी सा.बां. विभागाकडे नियमित स्वरूपात कार्यरत असलेल्या सर्वच पदवीधर विद्युत उपअभियंत्यांचा विचार त्यांच्या सेवाज्येष्ठतेनुसार करण्यात आलेला आहे. सदरनुसार समावेश करताना तथा त्यानुषंगाने ज्येष्ठताक्रम देताना महाराष्ट्र नागरी सेवा ( ज्येष्ठतेचे विनियमन ) नियमावली १९८२ मधील तरतुदींचा विचार करण्यात आलेला आहे. तथापि संदर्भ क्र. ३ व ४ येथील शासननिर्णयान्वये सन २०१५ मध्ये सरळसेवेने नियुक्त झालेल्या अभियंत्यांनी अद्याप परिविक्षाधिन कालावधी पुर्ण न केल्याने त्यांचा समावेश सदर ज्येष्ठतायादीमध्ये करण्यात आलेला नाही.

४. पदविकाधारक कनिष्ठ अभियंता (विद्युत) पदावर नियमितरित्या नेमणुक झालेल्या ज्या अभियंत्यांनी शासनसेवेत असताना ए.एम.आय.ई (बी.ई.पदवीशी समकक्ष) ही अर्हता धारण केलेली आहे, अशा अभियंत्यांना सहा.अभियंता श्रेणी-२ या संवर्गात समावेशनासाठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत घेण्यात येणारी मौखिक अर्हता परीक्षा उत्तीर्ण करावी लागेल, अशी अधिसूचना जलसंपदा विभागाने दि.१३.०३.२०१३ रोजी प्रसिध्द केली आहे. सदर अधिसूचनेप्रमाणे, सा.बां.विभागातील सहायक अभियंता श्रेणी-२ (विद्युत) संवर्गाच्या सेवाप्रवेश नियमामध्ये अनुषंगिक बदल प्रस्तावित आहे. ज्या पदविकाधारक कनिष्ठ अभियंता (विद्युत) यांनी शासनसेवेत असताना ए.एम.आय.ई (बी.ई.पदवीशी समकक्ष) ही अर्हता धारण केलेली आहे, अशा अभियंत्यांना पदोन्नतीच्या दिनांकानुसार ज्येष्ठतासुचीत दर्शविले असून सेवाप्रवेश नियमातील प्रस्तावित सुधारणेनुसार संबधित अभियंत्यांच्या ज्येष्ठतासूचीमधील स्थाननिश्चितीसंदर्भात स्वतंत्रपणे आदेश जारी करण्याची कार्यवाही करण्यात येईल.

५. सदर ज्येष्ठतासूचीत दर्शविलेल्या ( पदोन्नती मार्गाने आलेल्या ) उपअभियंता (विद्युत) यांची ज्येष्ठता, त्यांनी शासन नियमानुसार विहीत केलेली विभागीय परीक्षा आवश्यक कालावधीत उत्तीर्ण करण्याच्या अधीन दर्शविलेली आहे. तसेच या यादीतील सरळसेवानियुक्त उपअभियंता (विद्युत) यांच्याही सेवाज्येष्ठता, त्यांनी विहीत केलेली विभागीय परीक्षा आवश्यक कालमर्यादेत उत्तीर्ण होण्याच्या तसेच परिविक्षाधिन कालावधी यशस्वीरित्या पुर्ण करण्याच्या अधीनतेने दर्शविलेल्या आहेत.

६. उक्त नमूद वस्तुस्थितीनुषंगाने तसेच उद्योग उर्जा व कामगार विभागाच्या शासननिर्णय, संकीर्ण २०१४ /प्र.क्र.५८८/उर्जा-२, दि.२६.०२.२०१५ नुसार सा.बां.विद्युत विभागातील कार्यरत उपअभियंता (विद्युत) यांच्या संवर्ग संख्येत झालेला बदल विचारात घेऊन आणि महाराष्ट्र नागरी सेवा ( ज्येष्ठतेचे विनियमन ) नियमावली १९८२ मधील तरतुदींनुसार प्रस्तुत ज्येष्ठतासूची प्रसिध्द करण्यात येत आहे.

७. सदरहू ज्येष्ठतासूचीमध्ये काही त्रुटी किंवा वास्तविक चुका असतील तर, त्या संदर्भातील निवेदने संबंधितांनी शासनास १५ दिवसात शासनास पोच होतील अशा प्रकारे सादर करावीत. या कालावधीत शासनास प्राप्त झालेली निवेदने विचारात घेऊन सदर ज्येष्ठतासूची अंतिम करण्याची कार्यवाही करण्यात येईल.

८. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेताक २०१७०१०४१४२६२५१४१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Ashok G Chaudhari

Digitally signed by Ashok G Chaudhari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=92dfcb36eb3e19a8b418253e74d5703e6259839ca647379da27173dd25272748, cn=Ashok G Chaudhari
Date: 2017.01.04 14:39:36 +05'30'

**सहपत्र** :- परिशिष्ट

**( अशोक चौधरी )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

उप अभियंता (विद्युत)/ सहायक विद्युत निरीक्षक (परिशिष्ठातील यादीप्रमाणे ),महाराष्ट्र राज्य.

- मुख्य अभियंता , सार्वजनिक बांधकाम विद्युत विभाग,महाराष्ट्र राज्य यांनी ज्येष्ठतासूचीमधील सर्व संबंधित उप अभियंता (विद्युत) यांना देऊन त्याची पोच प्राप्त करावी.

**प्रत,**

१) मुख्य अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग, बांधकाम भवन, फोर्ट, मुंबई.

२) सर्व अधिक्षक अभियंते (विद्युत), सा.बांधकाम मंडळ.
३) स्वीय सहाय्यक,सचिव (बांधकामे) सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय, मुंबई,
४) स्वीय सहाय्यक, सचिव (रस्ते) सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय,मुंबई,
५) आस्थापना-३ / सेवा-१ / सेवा-२ , संगणक कक्ष,सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय, मुंबई,
६) आस्थापना -१ कार्यासन ( निवडनस्ती)

## परिशिष्ट

*शासन परिपत्रक ज्येष्ठता २०१६/प्र.क्र.१३९/ आस्था-१, दि.०४.१.२०१७ चे सहपत्र*

**सा.बां.विद्युत संघटनेमधील पदवीधर उप अभियंता (विद्युत) / सहायक विद्युत निरीक्षक या संवर्गाची दि.०१.०१.२०१६ रोजीची ज्येष्ठतासूची**

| अ.क्र. | ज्येष्ठता क्रमांक | नाव | जात प्रवर्ग | जन्मदिनांक | नियुक्ती दिनांक | नियुक्तीचा मार्ग | ज्येष्ठतेचा दिनांक | सेवानिवृत्ती दिनांक | शैक्षणिक अर्हता | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ |
| १ | १ | श्री.प्रशांत अविनाश दोडे | | ८.१२.१९६८ | २४.१.२००६ | पदोन्नतीने | २४.१.२००६ | ३१.१२.२०२६ | बी.ई.(इ) | |
| २ | २ | श्री.संजय वै. मिश्रा | | २९.११.१९६७ | २०.३.२००६ | पदोन्नतीने | २४.१.२००६ | ३०.११.२०२५ | बी.एस.सी (इ) | |
| ३ | ३ | श्री.हेमंतकुमार हिरामण पाटील | | २७.१.१९७५ | २०.३.२००६ | पदोन्नतीने | २४.१.२००६ | ३१.१.२०३३ | बी.ई.(इ) | |
| ४ | ४ | श्री.विजय शालीग्राम पुसदकर | | ३.९.१९७२ | २०.३.२००६ | पदोन्नतीने | २४.१.२००६ | ३०.९.२०३० | बी.ई.(इ) | |
| ५ | ५ | श्री.संजय रावसो पुजारी | भ.ज.(क) | १२.४.१९७५ | २४.१.२००६ | पदोन्नतीने | २४.१.२००६ | ३०.४.२०३३ | बी.ई.(इ) | |
| ६ | ६ | श्री.कुलदिपकुमार बापुराव खरे | अ.जा. | २६.३.१९६२ | ७.७.२००७ | पदोन्नतीने | ७.७.२००७ | ३१.३.२०२० | ए.एम. आय.ई | |
| ७ | ७ | श्रीमती. नलिनी सुहास सुत्रावे | | १५.१०.१९७४ | ७.७.२००७ | पदोन्नतीने | ७.७.२००७ | ३१.१०.२०३२ | बी.ई.(इ) | |
| ८ | ८ | श्री.मानसिंग रंगराव शिंदे | | १.६.१९७० | ७.७.२००७ | पदोन्नतीने | ७.७.२००७ | ३१.५.२०२८ | बी.ई.(इ) | |
| ९ | ९ | श्री.संभाजी लक्ष्मण घोरपडे | | १.६.१९६९ | ७.७.२००७ | पदोन्नतीने | १६.४.२००८ | ३१.५.२०२७ | बी.ई.(इ) | |
| १० | १० | श्री.प्रसन्न वामन नारखेडे | | ९.७.१९७३ | ७.७.२००७ | पदोन्नतीने | १६.४.२००८ | ३१.७.२०३१ | बी.ई.(इ) | |

| | | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ११ | ११ | श्रीमती अनघा एम. पुराणिक | | २.६.१९७२ | ७.७.२००७ | पदोन्नतीने | १.४.२०१० | ३०.६.२०३० | बी.ई.(इ) | |
| १२ | १२ | श्रीमती. संजीवणी धनंजय कटटी | | २४.२.१९७३ | ७.७.२००७ | पदोन्नतीने | १.४.२०१० | २८.२.२०३१ | बी.ई.(इ) | |
| १३ | १३ | श्रीमती ऋतुजा केतन गाडगीळ | | ४.९.१९७५ | ७.७.२००७ | पदोन्नतीने | १.४.२०१० | ३०.९.२०३३ | बी.ई.(इ) | |
| १४ | १४ | श्रीमती. सुनिता कैलास रावते | | १.८.१९७२ | ७.७.२००७ | पदोन्नतीने | ३.१०.२०११ | ३१.७.२०३० | बी.ई.(इ) | |
| १५ | १५ | श्री.श्रीनिवास सुर्यकांत गुजरे | | ११.११.१९८० | २९.८.२०१२ | सरळसेवा | २९.८.२०१२ | ३०.११.२०३८ | बी.ई.(इ) | |
| १६ | १६ | श्रीमती. पुनम अजय वर्मा | वि.जा.अ. | २०.१.१९७९ | २९.८.२०१२ | सरळसेवा | २९.८.२०१२ | ३१.१.२०३७ | बी.ई.(इ) | |

--------------x------------------